## . . शंकराची आरती . .

लवथवती विक्राळा ब्रह्मांडी माळा वीषें कंठी काळा त्रिनेत्री ज्वाळा
लावण्य सुंदर मस्तकीबाळा तेथुनिया जळ निर्मळ वाहे झुळझुळा

जय देव जय देव जय श्रीशंकरा आरती ओवाळू तुज कर्पुरगौरा
जय देव जय देव . . धृ . .

कर्पुरगौरा भोळा नयनी विशाळा अर्धांगी पार्वती सुमनांच्या माळा
विभुतीचे उधळण शितकंठ नीळा ऐसा शंकर शोभे उमा वेल्हाळा ...1
. . जय देव जय देव जय श्रीशंकरा... . .

देवी दैत्यी सागर मंथन पैं केले त्यामाजी अवचित हळहळ जे उठले
ते त्वां आसुरपणे प्राशन केले नीळकंठ नाम प्रसिद्ध झाले ...2
. . जय देव जय देव जय श्रीशंकरा... . .

व्यघ्रांबर फणिवरधर सुंदर मदनारी पंचानन मनमोहन मुनिजन सुखकारी
शतकोटीचे बीज वाचे उच्चारी रघुकुलतिलक रामदासा अंतरी ...3
. . जय देव जय देव जय श्रीशंकरा... . .